**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

क्रमांकः प्रतिनी१०११/प्र.क्र.५९/१४/का.१४

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: २२ सप्टेंबर, २०१४.

**आदेश**

श्री.भ.सं.वानखेडे, उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग यांची प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, अमरावती या पदावर दोन वर्षे कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

अ) श्री. वानखेडे **ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल** त्यानंतर दोन वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करून त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रूजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवतील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री. वानखेडे, यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. तसेच म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन ) मधील तरतुदी विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभाग/का.१९ तसेच सा.प्र.वि./का.११ अ, यांनी प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. श्री.वानखेडे यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामान्य प्रशासन विभाग/का.१९ तसेच सा.प्र.वि./का.११ अ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील. श्री.भ.सं.वानखेडे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२२१६५४४७३१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADIK SUCHITA M

Digitally signed by MAHADIK SUCHITA M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MAHADIK SUCHITA M
Date: 2014.09.22 16:49:55 +05'30'

**(सु.मो.महाडिक)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

श्री. भ.सं.वानखेडे, उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग

प्रत,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
३) प्र.स. (सेवा) सा.प्र.वि,
४) प्रधान सचिव/सचिव, सा.प्र.विभाग,
५) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
६) उप सचिव/अवर सचिव (आस्थापना), सा.प्र.विभाग,
७) सा.प्र.वि./का.११ अ
८) निवड नस्ती/का.१४.